कोषागारातून रोख देय अनुदान
केंद्र पुरस्कृत स्वच्छ भारत मिशन अंतर्गत सन २०१८-१९ या आर्थिक वर्षासाठी राज्य हिश्श्याचे सर्वसाधारण घटकासाठी अनुदान वितरीत करण्याबाबत..
(लेखाशीर्ष २२१५ २१८९)

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः स्वभामि-२०१८/प्र.क्र.५१२/पापु-१६**
७ वा मजला, जी.टी. रूग्णालय संकुल,
टिळक रोड, मंत्रालय, मुंबई- ४०० ००१.
तारीख: २१ डिसेंबर,२०१८

वाचा :

१) **पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,शासन निर्णय क्रमांकः** स्वभामि-२०१८/प्र.क्र.४६४/पापु-१६, दिनांक - १४ ऑगस्ट, २०१८
२) **पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,शासन निर्णय क्रमांकः** स्वभामि-२०१८/प्र.क्र.४८५/पापु-१६, दिनांक - २७ सप्टेंबर,२०१८
३) **पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,शासन निर्णय क्रमांकः** स्वभामि-२०१८/प्र.क्र.४८४/पापु-१६, दिनांक - २९ ऑक्टोबर, २०१८
४) **वित्त विभाग,शासन परिपत्रक क्रमांकः** अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३,दि.२ एप्रिल,२०१८.

प्रस्तावना :

केंद्र पुरस्कृत स्वच्छ भारत मिशनच्या (ग्रा.) राज्य हिश्श्यासाठी सर्वसाधारण घटकाखाली २२१५ २१८९ या लेखाशीर्षांतर्गत सन २०१८-१९ वर्षाकरीता रूपये ५१००.००लक्ष इतका नियतव्यय मंजुर करण्यात आला आहे. अर्थसंकल्पीत करण्यात आलेल्या रूपये ५१००.०० लक्ष इतक्या निधीपैकी रूपये ३५७०.०० लक्ष (रूपये पस्तीस कोटी, सत्तर लक्ष ) एवढा निधी वित्त विभागाने अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीद्वारे उपलब्ध करून दिलेला आहे.सदर निधी संबधीत अंमलबजावणी यंत्रणांना वितरीत करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

शासन निर्णय:

केंद्र पुरस्कृत स्वच्छ भारत मिशनच्या (ग्रा.) राज्य हिश्श्यासाठी सर्वसाधारण घटकाखाली २२१५ २१८९ या लेखाशीर्षांतर्गत सन २०१८-१९ वर्षाकरीता रूपये ५१००.००लक्ष (रूपये

एकावन्न कोटी) इतका नियतव्यय मंजुर करण्यात आला आहे. अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या रू.५१००.०० लक्ष इतक्या निधीपैकी रूपये ३५७०.०० लक्ष (रूपये पस्तीस कोटी, सत्तर लक्ष) एवढा निधी वित्त विभागाने अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीद्वारे उपलब्ध करून दिलेला आहे. अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या सदर रुपये ३५७०.०० लक्ष (रूपये पस्तीस कोटी, सत्तर लक्ष) इतका निधी संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था यांचे अधिनिस्त ठेवण्यास शासन मान्यता देण्यात आहे. वाचा १, २ व ३ येथील शासन निर्णांयानुसार सन २०१८-१९ या आर्थिक वर्षाकरिता केंद्र हिश्शाच्या सर्वसाधारण, अनुसुचित जमाती व अनुसुचित जाती घटकांतर्गत प्राप्त झालेल्या निधीमधून माहिती शिक्षण व संवाद, क्षमता बांधणी व प्रशासकीय बाबींसाठी फक्त रूपये १७७०.७६ लक्ष (रूपये सतरा कोटी, सत्तर लक्ष,शहात्तर हजार) इतका निधी राज्यस्तरावर संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था यांना वितरीत करण्यात आलेला आहे. त्यानुषंगाने सदर निधीच्या प्रमाणात राज्य हिस्सा (४०%) रू.११८०.५१ लक्ष (रूपये अकरा कोटी, ऐंशी लक्ष, एकावन्न हजार) इतका निधी पाणी व स्वच्छता सहाय्य संस्थेस राज्य हिश्श्याच्या रूपये ३५७०.०० लक्ष (रूपये पसतीस कोटी,सत्तर लक्ष) इतक्या निधीतून आहरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे. उर्वरित राज्य हिस्सा रूपये २३८९.४९ लक्ष (रू.३५७०.०० लक्ष - रू.११८०.५१ लक्ष) इतका राज्यस्तरावर संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था यांचे अधिनिस्त ठेवण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे. सदर निधीबाबत संचालक, पाणी व स्वच्छता सहाय संस्था यांचेकडून जिल्हानिहाय निधी वितरणाबाबत सविस्तर प्रस्ताव प्राप्त झाल्यानंतर त्यानुषंगाने सदर निधी वितरणाबाबत सविस्तर स्वतंत्र आदेश निर्गमित करण्यात येतील.

२. राज्य हिश्श्यापोटी राज्यस्तरावर प्राप्त झालेली रू.३५७०.००लक्ष एवढी रक्कम आहरण व संवितरण अधिकारी तथा वित्त नियंत्रक, रिफॉर्म सपोर्ट व प्रोजेक्ट मॅनेजमेंट युनिट (जलस्वराज्य प्रकल्प टप्पा-२), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांचेकडे BEAMS प्रणालीवर वितरीत करण्यात येत आहे. सदर रक्कमेतून रूपये ११८०.५१ लक्ष (रूपये अकरा कोटी ऐंशी लक्ष एकावन्न हजार) अधिदान व लेखाधिकारी कार्यालय, मुंबई यांच्या कार्यालयातून आहरीत करण्यासाठी आहरण व संवितरण अधिकारी तथा वित्त नियंत्रक, रिफॉर्म सपोर्ट व प्रोजेक्ट मॅनेजमेंट युनिट (जलस्वराज्य प्रकल्प टप्पा-२) (श्री. एल.ए. जाधव), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांना व नियंत्रक अधिकारी म्हणून उप सचिव तथा प्रकल्प संचालक, सुधारणा सहाय्य व प्रकल्प व्यवस्थापन कक्ष (श्री. अभय महाजन), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. सदर रक्कम रूपये ११८०.५१ लक्ष (रूपये अकरा कोटी, ऐंशी लक्ष, एकावन्न हजार) इतकी आहरण व संवितरण अधिकारी तथा वित्त नियंत्रक, रिफॉर्म सपोर्ट व प्रोजेक्ट मॅनेजमेंट युनिट (जलस्वराज्य प्रकल्प टप्पा-२), (श्री. एल.ए. जाधव),पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांनी अधिदान व लेखाधिकारी, मुंबई यांच्या कार्यालयातून आहरीत करून स्वतंत्र धनादेशान्वये संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, नवी मुंबई यांच्याकडे सुपूर्द करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.”

३. या शासन निर्णयाद्वारे मुक्त केलेली रक्कम पुढील अटींवर मंजूर करण्यात येत आहे.

अ) या शासन निर्णयाद्वारे मंजूर केलेले अनुदान ज्या करणासाठी मंजूर करण्यात आले आहे त्याच करणासाठी खर्च करण्यात यावे. पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, नवी मुंबई यांनी या शासन निर्णयाद्वारे मुक्त केलेला निधी, या कार्यक्रमासाठी उघडलेल्या स्वतंत्र बँक खात्यात जमा करावा.

आ) पाणी व स्वच्छता सहाय्य संस्थेने या शासन निर्णयाद्वारे मंजूर करण्यात आलेल्या अनुदानापेक्षा जास्त खर्च करू नये.

इ) अट क्र.३-अ आणि ३-आ यांची पुर्तता झाली आहे याची खात्री करण्यासाठी, महालेखापाल-१, मुंबई व महालेखापाल-२, नागपूर यांच्याकडे पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, नवी मुंबई संबंधित अधिकारी/कर्मचारी यांनी लेखे तपासणीसाठी सर्व कागदपत्रे उपलब्ध करून द्यावीत.

ई) सदर रक्कम केंद्र शासनाने ठरवून दिलेल्या मार्गदर्शक सूचनांमधील तरतूदींनुसार तसेच या संदर्भात राज्य शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या सूचनेप्रमाणे/ आदेशाप्रमाणे खर्च करण्यात यावी.

उ) ग्रामीण स्वच्छता कार्यक्रमाचा विहित नमून्यातील मासिक प्रगती अहवाल प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत शासनास पाठविण्याची दक्षता घ्यावी. शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या सूचनेप्रमाणे जिल्हा परिषदांनी या अनुदानाच्या खर्चाचा महालेखापाल कार्यालयात नोंदविलेल्या खर्चाशी ताळमेळ घालावा व ताळमेळाचे अहवाल विहित कालावधीत या विभागातील पापु-०४, पापु-१६ व पापु-२० या कार्यासनांस सादर करावा.

ऊ) पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था यांनी निधी वितरण, खर्च याबाबतची नोंद केंद्र शासनाच्या संकेतस्थळावर (IMIS) घेण्याची दक्षता घ्यावी.

ऋ) सदर रक्कम खर्च करताना वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि. ०२एप्रिल, २०१८ मधील अटी व शर्तींचे काटेकोरपणे पालन करून आवश्यक बाबींची पुर्तता करून कार्यपूर्ती अहवाल/नमूद प्रमाणपत्रे शासनास त्वरीत सादर करावीत.

ऌ) सदर रक्कम खर्च झाल्यानंतर त्याचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास त्वरित सादर करावे.

४. हा खर्च "मागणी क्रमांक वाय-२, २२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता, ०२ जलनि:स्सारण व स्वच्छता, १०७ मलप्रणाल सेवा, (०२) ग्रामसफाई कार्यक्रमांतर्गत अर्थसहाय्य (राज्य पुरस्कृत योजना) - (०२) (०५)केंद्र सहाय्यित योजनेअंतर्गत शौचालय बांधणे (राज्य हिस्सा)३३ अर्थसहाय्य, (२२१५ २१८९ ) " या लेखाशीर्षाखाली घालावा. सदर अनुदन सशर्त मंजूर करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय व वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि.०२ एप्रिल,२०१८ अन्वये या विभागास प्रदान केलेल्या अधिकारात तसेच सदर परिपत्रकातील अटी व शर्तींच्या अधीन राहून मुक्त करण्यात येत आहे. सदर परिपत्रकातील परिच्छेद ६ ते १० मधील

अटींची तसेच सदर परिपत्रकासोबतच्या परिशिष्टातील अ.क्र. ८ मधील तपासणी सूचीतील १ ते १० अटींची पुर्तता होत असल्याचे प्रमाणीत करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१२२११२५६०९५५२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Smita Sachin Rane

Digitally signed by Smita Sachin Rane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply and Sanitation Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f85d92aa99ea42eb86747707e3c3a129af986c1f95f6bc3e8165ceaf5155e6e7, serialNumber=4b9befd340493837db4cffafa6b96eeaf6aa3c12a7a6bf0467b0f517b724e8ee, cn=Smita Sachin Rane
Date: 2018.12.21 14:28:59 +05'30'

**( स्मिता. स. राणे )**
कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
२. महालेखापाल, महाराष्ट्र- १/२ मुंबई/नागपूर (लेखा परीक्षा व अनुज्ञेयता)
३. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
४. मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, मुंबई/नागपूर.
५. संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, (WSSO), बेलापूर, नवी मुंबई.
६. नियोजन विभाग, (का.क्र.१४४३) मंत्रालय, मुंबई.
७. वित्त विभाग, (व्यय-३) मंत्रालय, मुंबई.
८. कार्यासन क्र.पापु-०४, पापु-२०, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. निवड नस्ती, कार्यासन पापु-१६.